**वाशी पो.स्टे, गु.नों.क्र.६७/२०१३, सत्र न्यायालय, ठाणे खटला क्र. २८१/२०१३ चे प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.विद्या कासले कासले यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एसपीपी २०१५/प्र.क्र.३५/पोल-१०**
२ रा मजला, हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०२ सप्टेंबर, २०१५.

<u>संदर्भ :</u>- शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र. एसपीपी- ३८१५/ ए.एस.२७ / डी-चौदा, दिनांक ०६.०५.२०१५

<u>शासन निर्णय</u> :-

वाशी पो.स्टे, गु.नों.क्र.६७/२०१३, सत्र न्यायालय, ठाणे खटला क्र. २८१/२०१३ चे प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड. विद्या कासले यांची विधी व न्याय विभागाच्या दिनांक २०.१०.२०१४ च्या अधिसूचनेन्वये नियुक्ती करण्यात आली आहे.

२. प्रस्तुत खटल्यासाठी ॲड.विद्या कासले यांना प्रतिदिनी परिणामकारक सुनावणी फी रुपये २०,०००/- या प्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, प्रस्तुत प्रकरणी त्यांना अपरिणामकारक सुनावणी फी, किंवा अन्य कोणत्याही प्रकारची भत्ते अनुज्ञेय असणार नाही.तसेच प्रकरणाच्या अंतिम सुनावणीनंतर एकत्रित फी ला वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उप आयुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७४/१४/व्यय-७, दिनांक २२.६.२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०९०२१६०२१४५९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2015.09.02 16:16:32 +05'30'

**(अ.वि.जोशी)**
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२) सह पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई.
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६) विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
७) विधि व न्याय विभाग (अ-शाखा), मंत्रालय, मुंबई.
८) वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९) ॲड. विद्या कासले, डी.एन.मंझील, कॉंग्रेस हाऊस,व्ही.पी.रोड, मुंबई.
१०) निवड नस्ती (पोल-१०)